महाराष्ट्राचा सर्वसाधारण रहिवास नसलेल्या ( Ordinary Residence ) इतर राज्यां-तून महाराष्ट्रात स्थलांतरीत झालेल्या मागासवर्गीय व्यक्तींचा जाती दावा तपासण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग,
शासन परिपत्रक, क्रमांक: सीबीसी-1696/प्र.क्र.64/मावक-5,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-400 032, दिनांक 21 ऑगस्ट, 1996.

वाचा :- (1) शासन परिपत्रक, समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग, क्रमांक:सीबीसी-1290/23116/प्र.क्र.378/मावक-5, दिनांक 24 ऑगस्ट, 1995.

(2) शासन पत्र, समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग, क्रमांक: सीबीसी-1696/प्र.क्र.64/मावक-5, दिनांक 10 एप्रिल, 1996.

शासन परिपत्रक :- शासन परिपत्रक, क्रमांक: सीबीसी-1290/23116/प्र.क्र.378/मावक-5, दिनांक 24 ऑगस्ट, 1995 अन्वये अशा सूचना देण्यात आल्या आहेत की, मागासवर्गीय (अनुसूचित जमाती सोडून) जाती/जमातीच्या व्यक्तींचा सर्वसाधारण रहिवास ( Ordinary Residence ) महाराष्ट्रात नसून त्या व्यक्ती इतर राज्यातून महाराष्ट्रात स्थलांतरित झालेल्या असल्यास, अशा व्यक्तींना मागासवर्गीयांच्या सवलती महाराष्ट्रात देय नाहीत. ही तरतूद लक्षात घेऊन असे स्पष्ट करण्यात येते की, महाराष्ट्रात सर्वसाधारण रहिवास ( Ordinary Residence) नसलेल्या व्यक्तींचा जाती दावा 'जात प्रमाणपत्र तपासणी समितीने ' तपासून देवू नये. वरीलप्रमाणे खुलासा करून त्यांचे अर्ज संबंधितांना परत करण्यात यावेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

स. नु. गावीत
स. नु. गावीत,
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

राज्यपालांचे सचिव,
मुख्यमंत्र्यांचे सचिव,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
महालेखापाल, महाराष्ट्र-1/2, मुंबई/नागपूर,
सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई,
सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
मुख्य महानगर दंडाधिकारी,
सर्व जिल्हा दंडाधिकारी/उप जिल्हाधिकारी,

(क.मा.प.)